मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-३ प्रकल्पामधील राज्यशासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन यांना वितरित करण्याबाबत (सन २०२१-२२)

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२१/प्र.क्र.३४/नवि-७**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक: १८ जानेवारी, २०२२.**

**पहा :**

१. नगर विकास विभाग, शा.नि. क्र.एमआरडी -३३११/प्र.क्र.१४९/नवि-७, दिनांक ३ मार्च ,२०१४.
२. नगर विकास विभाग, शा.नि, क्र.एमआरडी -३३१४/प्र.क्र.१९९/नवि-७, दिनांक १३ ऑक्टोबर, २०१५.
३. नगर विकास विभाग, शा.नि, क्र.एमआरडी -३३१४/प्र.क्र.१९९/नवि-७, दिनांक १० नोव्हेंबर, २०१५.
४. नगर विकास विभाग, शा.नि, क्र.एमआरडी -३३१४/प्र.क्र.१९९/नवि-७, दिनांक २१ मार्च , २०१६.
५. नगर विकास विभाग, शा.नि, क्र.एमआरडी -३३१७/प्र.क्र.१८/नवि-७, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१७.
६. नगर विकास विभाग, शा.नि, क्र.एमआरडी -३३१७/प्र.क्र.१०५/नवि-७, दिनांक २८ मार्च, २०१८.
७. नगर विकास विभाग, शा.नि. क्र.एमआरडी -३३१८/प्र.क्र.९९/नवि-७, दिनांक ३ डिसेंबर,२०१८.
८. नगर विकास विभाग, शा.नि. क्र.एमआरडी -३३१८/प्र.क्र.९९/नवि-७, दिनांक २० मार्च, २०१९.
९. शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३१९/प्र.क्र.६९/नवि-७ दिनांक १८ मार्च, २०२०.
१०. शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.६९/नवि-७, दिनांक २७ मार्च, २०२०.
११. शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२१/प्र.क्र.०१/नवि-७ दिनांक ०४ मार्च, २०२१.
१२. शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२१/प्र.क्र.०१/नवि-७ दिनांक २६ मार्च, २०२१.
१३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दिनांक २४ जून, २०२१.

**प्रस्तावना :**

मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-३ प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी केंद्र व राज्य शासनाचा ५०:५० सहभाग असलेल्या मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. स्थापन करण्यात आली आहे. केंद्रीय शहर विकास मंत्रालयाचे पत्र क्रमांक No.K-१४०११/३६/२००९-Metro/MRTS-II (Vol.III), दिनांक १८ जुलै, २०१४ चे पत्रानुसार मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-३ प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी केंद्र व राज्य शासनाचा ५०:५० सहभाग असलेल्या मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. विशेष हेतू वाहन कंपनी स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर कंपनीमध्ये राज्य शासन व केंद्र शासन यांची समान गुंतवणूक राहणार आहे. सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या कर/शुल्क च्या ५०% रक्कम तसेच प्रकल्पासाठी खाजगी जमीनीचे संपादन / पुनर्वसन व पुनर्वसाहत यावरील खर्चासाठी राज्य शासनाकडून रु १६१५.१० कोटी बिनव्याजी दुय्यम कर्ज आणि सदर प्रकल्पावर लागू होणाऱ्या राज्यशासन/स्थानिक करांपोटी रु. ८०६ कोटी बिनव्याजी दुय्यम कर्ज असे एकूण रु.२४२१.१० कोटी इतकी रक्कम राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून द्यावयाची आहे. आतापर्यंत, सन २०१५-१६ या वर्षात रु. ५५.३२ कोटी,

सन २०१६-१७ मध्ये रु. ९०.४७ कोटी, सन २०१७-१८ मध्ये रु. १३० कोटी व सन २०१८-१९ मध्ये रु.५०० कोटी, सन २०१९-२० मध्ये रु.५०० कोटी व सन २०२०-२१ मध्ये रु.४०० कोटी असे एकूण रु.१६७५.७९ कोटी निधी मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. कंपनीस राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्यात आला आहे. चालू आर्थिक वर्ष **सन २०२१-२२** मध्ये राज्य शासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य या प्रयोजनाकरिता रु.५०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर मंजूर तरतूदीमधून मधून **रु.२५० कोटी** इतकी रक्कम मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. कंपनीस राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. मुंबई मेट्रो रेल्वे लाईन -३ प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून **रु. २५०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोनशे पन्नास कोटी फक्त)** इतकी रक्कम मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-७, ६२१७- नगर विकासासाठी कर्जे ,८०, सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०१) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरीता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज, ५५, कर्जे व आगाऊ रकमा, सांकेतांक क्रमांक (६२१७०७७९) या लेखाशिर्षाखाली **सन २०२१-२२** मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी/नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उपसचिव/नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. शासन निर्णयातील परिच्छेद -१ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही कार्यासन नवि- ३१ ने करावी.

४. राज्यशासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत केलेल्या उपरोक्त **रु.२५० कोटी** रक्कमेचा विनियोग मुंबई मेट्रो लाईन-३ साठी मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडला केंद्रीय/ राज्यस्तरीय/ स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी तसेच खाजगी जमीनीचे संपादन/पुनर्वसन व पुनर्वसाहत यावरील खर्चासाठी करावयाचा आहे.

५. राज्यशासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत उपरोक्त रक्कम **रु.२५० कोटी** मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांच्याकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून सदर प्रकल्पासाठी जपान आंतरराष्ट्रीय सहकार्य संस्थेमार्फत घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करावयाची आहे.

६. सदर प्रकल्पाच्या मुळ मान्यतेनुसार सदरचे दुय्यम कर्ज बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरीत करण्यात येत असले तरी भविष्यात यावर व्याज आकारणी करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास त्या व्याजाची वसूली मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांच्याकडून करण्यात येईल.

७. सदर कर्ज सहाय्याची रक्कम व भविष्यात त्यावर काही व्याज आकारल्यास त्या व्याजाच्या रक्कमेसह सदर प्रकल्पाचे मुख्य कर्जाची परफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

८. मुंबई मेट्रो लाईन-३ या प्रकल्पाकरिता राज्यशासनाकडून केंद्रीय व राज्यस्तरीय/स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी तसेच खाजगी जमीनीचे संपादन/पुनर्वसन व पुनर्वसाहत यावरील खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड कडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

९. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण/राज्य शासन /केंद्रशासन यांना सादर करण्यात यावा.

१०. सदर प्रकल्पासाठी राज्यशासनामार्फत केंद्रीय व खाजगी जमीनीचे संपादन/पुनर्वसन व पुनर्वसाहत यावरील खर्चासाठी तसेच राज्यस्तरीय/स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रकमांसाठी मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत.

११. राज्यशासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जसहाय्यासाठी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

१२. मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीबाबत राज्य शासनाच्या वतीने महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत व वितरीत झालेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

१३. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनासाठी खर्च केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन यांनी महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे मार्फत सादर करावे.

१४. सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१५. राज्य शासनाकडून मुंबई मेट्रो लाईन-३ प्रकल्पाकरीता आतापर्यंत **रू.१६७५.७९ कोटी** इतका निधी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणेः-

| **अनु.क्र.** | **दिनांक** | **रक्कम (रु. कोटी)** | **निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव** | **एकूण वितरीत निधी (रु. कोटी)** |
|---|---|---|---|---|
| १ | १३.१०.२०१५ | ५५.३२ | राज्य शासन | ५५.३२ |
| २ | ३१.०३.२०१७ | ९०.४७ | राज्य शासन | १४५.७९ |
| ३ | २८.०३.२०१८ | १३०.०० | राज्य शासन | २७५.७९ |
| ४ | ०३.१२.२०१८ | १८०.०० | राज्य शासन | ४५५.७९ |
| ५. | २०.०३.२०१९ | ३२०.०० | राज्य शासन | ७७५.७९ |
| ६. | १८.०३.२०२० | ३००.०० | राज्य शासन | १०७५.७९ |
| ७ | २७.०३.२०२० | २००.०० | राज्य शासन | १२७५.७९ |
| ८ | ०४.०३.२०२१ | ३००.०० | राज्य शासन | १५७५.७९ |
| ९ | २६.०४.२०२१ | १००.०० | राज्य शासन | १६७५.७९ |
| १० | सदरचे वितरण | २५०.०० | राज्य शासन | १९२५.७९ |

१६. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. २४ जून, २०२१ सोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१७. सदर निधी वितरण आदेश नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.६२/का.१४४४ दि.२७.०८.२०२१ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४३८/व्यय-३ दिनांक १४.०१.२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

१८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०११८१४३७०३४८२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.02.01 11:36:03 +05'30'

**[विजय चौधरी]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
४. मा. मंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. मुंबई
११. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१२. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
१३. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
१४. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६. वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३.
१७. नियोजन विभाग (कार्यासन १४४४)
१८. उपसचिवन.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. कक्ष अधिकारी नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
२०. रोख शाखा (५ प्रती),
२१. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२१/प्र.क्र.३४/नवि-७ दि. १८ जानेवारी, २०२२ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना मुंबई मेट्रो रेल मार्गिका-३ साठी सन २०२१-२२ मध्ये रु.२५० कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.<br>(केंद्र व राज्यशासनाचे संयुक्त एसपीव्ही),<br>प्लॉट नं.आर.१३, ई-ब्लॉक, नामट्री बिल्डींग,<br>बीकेसी, वांद्रे (पूर्व),<br>मुंबई ४०० ०५१. |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | अनौपचारीक संदर्भ क्रमांकः- ४३८/व्यय-३<br>दिनांक १४.०१.२०२२ |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु.२४२१.१० कोटी दुय्यम कोटी |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०१५-१६ रु.५५.३२ कोटी<br>सन २०१६-१७ रु.९०.४७ कोटी<br>सन २०१७-१८ रु.१३०.०० कोटी<br>सन २०१८-१९ रु.५००.०० कोटी<br>सन २०१९-२० रु.५००.०० कोटी<br>सन २०२०-२१ रु. ४०० कोटी |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु.२५०.०० कोटी** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | - |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | **रु.२५०.०० कोटी** |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | मुख्य कर्जाची परतफेड झाल्यावर दुय्यम कर्जाची परतफेड सन २०४७ मध्ये सुरु होईल. त्यानंतर सदर दुय्यम कर्जाची वसूली एका हप्त्यात वसूली होणे अपेक्षित आहे. |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही. |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.02.01 11:36:21 +05'30'

**[विजय चौधरी]**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | सन २०५१ |
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | सन २०५१ |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | सन २०५१ |
| १४. | व्याज दर | बिनव्याजी दुय्यम कर्ज |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनिय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | लागू नाही. |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | एफ-७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे, ८०, सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना (००)(०१) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरीता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज, ५५ कर्जे व आगाऊ रक्कम, सांकेतांक क्रमांक (६२१७०७७९) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | लागू नाही. |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | संचालक (वित्त),<br>मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.,प्लॉट नं.आर.१३, ई-ब्लॉक, नामट्री बिल्डींग, बीकेसी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.<br>फोन नं.०२२/२६३८४६१७. |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१ |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.02.01 11:36:35 +05'30'

**[विजय चौधरी]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**************